२०१५०६२३१५२६०८३५२७ शिर्की वाशी खारभूमी योजना ता.पेण, जि.रायगड या योजनेच्या नुतनीकरणाच्या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

(२८०)

महाराष्ट्र शासन

जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्र.खाभूयो २०१०/(४६३/२०१०) खारभूमी

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक :- २२/०६/२०११

पहावे : मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्र.३८०६/खाभू/शिर्की वाशी/तां-२(१) ७४३५, दि.१९/१०/२०१०

प्रस्तावना :-

शिर्की वाशी खारभूमी योजना ता.पेण, जि.रायगड, सदर खारभूमी योजना बृहत आराखडयात समाविष्ट आहे. केंद्रीय वन मंत्रालयाने किनारी नियमन अधिनियम १९९१(CRZ) अन्वये या योजनेस सूट दिली आहे. सदर योजनेची एकूण लांबी ५९३० मी. आहे. त्यावर सा.क्र.७१० मी., ३२२५ मी. पाच उघाडया प्रस्तावित आहेत.. सदर योजना स्थानिक माती वापरुन बांधले आहे. योजनेचा बांध अतिशय कमकुवत झालेला असल्याने काही ठिकाणी खांडी व बांध गेल्यामुळे त्यात उघाडया नसल्याने शेतक-यांचे मोठे नुकसान होत आहे. यासाठी ही योजना होणे अत्यंत गरजेचे आहे. ही योजना तातडीने हाती घेण्याबाबत मा.आमदार, लाभधारक व ग्रामपंचायतीची आग्रही लेखी मागणी करण्यात आलेली आहे. त्यामुळे सदर योजनेचा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून प्राप्त झाला असून सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय

या शासन निर्णयान्वये शिर्की वाशी खारभूमी योजना ता.पेण, जि.रायगड या योजनेस सन २००८-०९ व सा.बां.वि. दरसूची २००९-१० या वर्षाच्या दरसूचीवर आधारित या योजनेस अंदाजित रू.३,६७,८५,२४१/- (रुपये तीन कोटी, सदुसष्ट लक्ष, पंच्याऐंशी हजार, दोनशे एकेचाळीस फक्त) यापैकी रू.३३,४४,११३/- अनुषंगिक खर्च इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. उपशीर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

D:\2011\MOHITE\suprama gr\New Microsoft Word Document.doc

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-३, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्र.एपीएच १०७३/३२६५३/ई(३),दि.१७.७.१९७४ मधील परिशिष्ट क्र.(३) व शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०६/प्र.क्र.८२/०६ विनियम दिनांक १३/०३/२००७ मधील तरतूदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता (४१/२०११) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( ज.प्र.जहागिरदार )
शासनाचे अवर सचिव

प्रतिलीपी अंदाजाच्या गोषवा-यावसह :-

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, (दवप्र) व सहसचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपसचिव (लघु पाटबंधारे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे
अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपअभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, रायगड
अर्थशाखा १/२(२ प्रती), जलसंपदा विभाग,
खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक खाभूयो २०१०/(५३७/२०१०) खारभूमी दिनांक /०३/२०११ चे सहपत्र
शिर्की वाशी खारभूमी योजना ता.पेण, जि.रायगड, अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | एकूण रुपयात |
|---|---|---|
| १ | 'अ' प्राथमिक | १७३२७०.०० |
| २ | 'बी' भूसंपादन | ०.०० |
| ३ | 'सी' मुख्य कामे | १७७३१४९५.०० |
| ४ | 'एफ' आर.एच.टी. वर्क्स | १५१८३१७९.०० |
| ५ | 'के' इमारती | ५००००.०० |
| ६ | 'एम' वृक्षारोपण | १२०८९७.०० |
| ७ | 'ओ' संकीर्ण | ५००००.०० |
| ८ | 'पी' देखभाल | ८२२८७.०० |
| ९ | 'आर' दळणवळण | ५००००.०० |
| | एकूण | ३,३४,४१,१२८.०० |
| | अनुषंगिक खर्च (भूसंपादन वगळून) | ३३,४४,११३.०० |
| | एकूण | ३,६७,८५,२४१.०० |
| | | |

<u>ठळक वैशिष्ट्ये</u>

| | |
|---|---|
| पुनःप्रापित क्षेत्र | ३१०.०० हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | ११८६६२.०० |
| लाभव्यय गुणोत्तर | २.५८ |

D:\2011\MOHITE\suprama gr\New Microsoft Word Document.doc